सन २०२१-२२ आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी विकास विभागाच्या कार्यक्रम खर्चाच्या योजनांतर्गत बांधील बाबींकरीता निधी वितरण.
(मागासवर्गीय कल्याण-लेखाशीर्ष २२२५ एफ १२९ )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२१/ प्र.क्र.०२/कार्यासन-६**
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २४ डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८ / अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२. शासन निर्णय, आ.वि.वि., क्र. बीयुडी-२०२१/ प्र.क्र.०१/ कार्यासन-६, दि.०७.०४.२०२१, दि.२८.०४.२०२१, दि.१७.०५.२०२१, दि.१.०६.२०२१, दि.२.०६.२०२१, दि.१५.०६.२०२१, दि.१८.०६.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.५.०७.२०२१, दि.४.०८.२०२१, दि.१.०९.२०२१ व दि.३०.०९.२०२१ व दि.३.११.२०२१.
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचा प्रस्ताव क्र.असं११२१/प्र.क्र.७/का-४(२) दि.१३.१२.२०२१

**प्रस्तावना : -**

आर्थिक वर्ष सन २०२१-२२ करीता वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये खर्चाचे प्राधान्यक्रम ठरवून वित्तीय उपाययोजना करण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. यास अनुसरून वित्त विभागाने अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर वेळोवेळी उपलब्ध करुन दिल्यानुसार तसेच वित्त विभागाने स्वतंत्र नस्तीवर मान्यता दिल्यानुसार आदिवासी विकास विभागाच्या कार्यक्रम खर्चांतर्गत समाविष्ट स्वयंसेवी संस्थांना आश्रमशाळा व मुलोगोद्योत्तर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहाय्यक अनुदाने (कार्यक्रम खर्च) (२२२५ एफ१२९) या योजनेच्या ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या बाबीकरीता अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ७५ टक्के मर्यादेतील निधी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्यात आलेला आहे.

आता संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरुन वित्त विभागाने सदर योजनेसाठी वेतन या बाबीकरीता अर्थसंकल्पित तरतूदीच्या ९०% मर्यादेतील निधी वितरणास मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर मर्यादेतील उर्वरीत १५% तरतूद संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ या खाली समाविष्ट स्वयंसेवी संस्थांना आश्रमशाळा व मुलोद्योगोत्तर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहाय्यक अनुदाने (कार्यक्रम खर्च) (२२२५ एफ१२९) या योजनेच्या ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या बाबीकरीता वित्त विभागाने दिलेल्या

मान्यतेस अनुसरून अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ९० टक्के मर्यादेतील उर्वरीत रू.१५०.०० कोटी इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला असून नियंत्रक अधिकारी यांनी वितरीत तरतुद त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित करावी. वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र. ९७५/व्यय-१४,दि.२३/१२/२०२१ अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२०१२०६२४९६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2021.12.24 11:11:11 +05'30'

**( रविंद्र दि.औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८. उपसचिव / कक्ष अधिकारी (का-११), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवड नस्ती (का-६).